**मौजे बेलखेडा, ता. कन्नड, जि. छत्रपती संभाजीनगर येथील पूर सरंक्षक भिंतीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग,

**शासन निर्णय क्रमांक: पुसंभि-२०२३/ (प्र.क्र. ३४८/२०२३)/ सिं.व्य.(महसूल)**

मंत्रालय, मुंबई ४०००३२,

दिनांक: १५/०३/२०२४

**वाचा :** १) शासन परिपत्रक क्र. एफडीडब्ल्यू १०९२/१७०-सिंव्य(कामे), दिनांक ०७/०८/१९९२.

२)शासन निर्णय क्र. पूसंभि २०१९/(प्र.क्र.११५/२०१९) /सिंव्य(म),दिनांक ३१/०८/२०१९.

**प्रस्तावना :-**

मौजे बेलखेडा, ता. कन्नड, जि. छत्रपती संभाजीनगर हे गाव नदीच्या तिरावर वसलेले आहे. पुराच्या तसेच पाण्याच्या दाबामुळे बाजूच्या शेतीच्या जवळ असलेली घरे, गावचे रस्ते, सार्वजनिक इमारती तसेच शासकीय मालमत्तेचे भरपुर नुकसान होत असल्यामुळे पूराच्या पाण्यापासून दोन्ही तीरावरील नदीकाठाचे व बंधाऱ्याचे रक्षण करण्याकरिता पूर संरक्षक भिंतीचे काम करुन मिळणेबाबत स्थानिक लोकप्रतिनिधीच्या मागणीनुसार क्षेत्रीय स्तरावरुन प्रस्ताव प्राप्त झाला आहे.

मौजे बेलखेडा, ता. कन्नड, जि. छत्रपती संभाजीनगर येथे प्रस्तावित ठिकाणी क्षेत्रीय कार्यालयाने प्रत्यक्ष पाहणी करुन पूर संरक्षक भिंतीच्या कामाचे अंदाजपत्रक शासनास सादर करण्यात आले आहे. मौजे बेलखेडा, ता. कन्नड, जि. छत्रपती संभाजीनगर येथील नदीकाठी पूर संरक्षक भिंत बांधकामाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

गोदावरी मराठवाडा विकास महामंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत मौजे बेलखेडा, ता. कन्नड, जि. छत्रपती संभाजीनगर येथील नदीच्या बाजूला पूर संरक्षक भिंत बांधकामाच्या प्रस्तावास प्रस्तावित पूर संरक्षक भिंत बांधण्याच्या कामासाठी रु. **३,३८,८२,७९६.००/-** (तीन कोटी अडतीस लाख ब्याऐंशी हजार सातशे शह्याण्णव रुपये)

एवढया खर्चाच्या जलसंपदा विभागाच्या सन २०२२-२३ व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०२२-२३ च्या दरसूचीवर आधारित अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

क) शासन निर्णय क्रमांक पुसंभि-२०१९/(प्र.क्र.११५/२०१९)/सिंव्य(म), दि.३१/०८/२०१९ मधील तरतूदी नुसार कार्यवाही करावी.

ख) शासन परिपत्रक क्र. एफडीडब्ल्यू - १०८९/२४३/८९/सिंव्य(कामे), दि.२१/०९/१९८९ व दि. ०३/०५/२०१८ नुसार पूर रेषा आखणी केल्यानंतरच पूर संरक्षक भिंतीची संरेखा निश्चित करावी. पूररेषा आखणी केल्याशिवाय कामे हाती घेण्यात येवू नयेत.

ग) अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे /संकल्पने, दरसूची बाह्य बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

घ) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करावयाचा आहे. या कामांना सुधारित प्रशासकीय मान्यता दिली जाणार नाही.

च) भिंतीच्या बांधकामासाठी भूसंपादन करु नये, बांधकामासाठी आवश्यक जमीन संबंधितांनी विनामोबदला उपलब्ध करुन द्यावी, पूर संरक्षक भिंतीच्या बांधकामामुळे नदीप्रवाहाला अडथळा निर्माण होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

छ) पूर संरक्षक योजना राबविल्यानंतर परिसरातील पाण्याचा निचरा योग्य पध्दतीने होईल, याची दक्षता नियोजनात घ्यावी.

ज) सदर योजना पूर्ण झाल्यानंतर पूर संरक्षक मौजे बेलखेडा, ता. कन्नड, जि. छत्रपती संभाजीनगर येथील नदीकाठी पूर संरक्षक भिंत बांधकामाच्या प्रस्तावास ग्रामपंचायत बेलखेडा ता. कन्नड, जि. छत्रपती संभाजीनगर ने ताब्यात घेऊन भविष्यातील देखभाल व दुरुस्ती करावयाची आहे. तांत्रिक मान्यता देण्यापूर्वी तसे लेखी बंधपत्र प्राप्त करून घेण्याची जबाबदारी सक्षम अधिका-यांची असेल.

झ) काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे.

ट) सदरहू कामास तांत्रिक मंजुरी देण्यापूर्वी संदर्भ क्र. २ मधील शासन निर्णयातील अटींचे काटेकोरपणे पालन करावे. सदरच्या ठिकाणी पूररेषा निश्चितीची कार्यवाही पूर्ण झाल्याखेरीज या कामांस तांत्रिक मंजुरी देता येणार नाही.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च "४७११ पुरनियंत्रण प्रकल्पावरील भांडवली खर्च, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) (०१) गोदावरी मराठवाडा विकास महामंडळ, छत्रपती संभाजीनगर भागभांडवली अंशदान (४७११ ०२३६)" या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य. (महसूल) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. ०३/ सन २०२४ वर नोंदविण्यात आलेली आहे.

वित्तीय अधिकार नियमपुस्तिका - १९७८ भाग पहिला मधील तरतुदीनंतर प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकार व आंतरवित्तीय सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र २०२४०३१५१६१५१००९२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SONAL ANAND GAIKWAD

Digitally signed by SONAL ANAND GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=2de9efbff657631a65d78997e0ca3abe497df4a58a3780cae2980bef45f5c5e1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F9F2A1323FB2F904BB9F38B4E7461B2C05FBB18A306A192E2149168DAABEC890, cn=SONAL ANAND GAIKWAD
Date: 2024.03.15 16:24:29 +05'30'

**( सोनल गायकवाड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे अपर मुख्य सचिव,मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. उपमुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई

६) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
७) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई
८) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
९) अपर मुख्य सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
१०) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) महालेखापाल-१ (लेखा वअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१२) महालेखापाल-२ (लेखा वअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१३) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा विकास महामंडळ, छत्रपती संभाजीनगर
१४) मुख्य अभियंता, (जसं), जलसंपदा विभाग, छत्रपती संभाजीनगर
१५)आंतरवित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६)अधीक्षक अभियंता, छत्रपती संभाजीनगर पाटबंधारे मंडळ, छत्रपती संभाजीनगर
१७) सिं.व्य. (महसूल) कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक : पुसंभि-२०२३/ (प्र.क्र.३४८/२०२३)/ सिंव्य (महसूल), दि.१५.०३.२०२४ चे सहपत्र

## परिशिष्ट

| Sr.No. | Description of Item | Amount |
|---|---|---|
| 1 | C - Works (excluding Royalty) | 27346107.00 |
| 2 | Royalty | 794007.00 |
| 3 | 1 % Insurance | 273461.00 |
| 4 | 2 % Contingencies | 546922.00 |
| 5 | 18 % GST | 4922299.00 |
| | **Total Rs.** | **33882796.00** |

SONAL ANAND GAIKWAD

Digitally signed by SONAL ANAND GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=2de9efbff657631a65d78997e0ca3abe497df4a58a3780cae2980bef45f5c5e1, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F9F2A1323FB2F904BB9F38B4E7461B2C05FBB18A306A192E2149168DAABEC890, cn=SONAL ANAND GAIKWAD
Date: 2024.03.15 16:24:53 +05'30'

(सोनल गायकवाड)

शासनाच्या अवर सचिव